# महाराष्ट्र शासन

क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.१०/आपुक
वित्त विभाग, मंत्रालय,
हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई - ४०० ०३२.
दि.:- २८ जानेवारी, २०१९

संदर्भ :- १. शासन अधिसूचना, साप्रवि, क्र. आरव्ही २००४/प्र.क्र.१५/०४/१२, दि.२५/०५/२००६,
२. शासन अधिसूचना, साप्रवि, क्र. पीओडी १००७/प्र.क्र.९/१८(रवका), दि.१४/११/२०१३,
३. शासन परिपत्रक, साप्रवि, क्र. संकीर्ण २०१२/प्र.क्र.५४/१८(रवका), दि.११/०८/२०१४.

## कार्यालयीन आदेश

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियम आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ९ (१) व (२) मधील तरतूदीस अनुसरून शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध नियम, २०१३ तयार करण्यात आलेले असून ते दिनांक १४ नोव्हेंबर, २०१३ च्या अधिसूचनेद्वारे राज्यात लागू करण्यात आलेले आहेत. त्यातील कलम ६ अंतर्गत विभागाशी / कार्यालयाशी संबंधित सर्व बाबींवर अंतिम निर्णय घेण्याच्या दृष्टीने प्रकरणे सादर करण्याबाबत अधिकाऱ्यांचे तीन स्तर निर्धारित करण्यासाठी दि. ०९ सप्टेंबर, २०१४ रोजी शासन आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

२. त्यानुषंगाने वित्त विभाग/आकृतीबंध व पुनर्रचना कक्ष या कार्यासनाशी संबंधित विषयाच्या बाबतीत सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे निर्णय घेण्यासाठी **सादरीकरणाचे तीन स्तर** निश्चित करण्यात येत आहेत. तथापि, वरीष्ठ अधिकाऱ्यांचे निदेशानुसार किंवा काही अपवादात्मक प्रकरणी आवश्यकता भासल्यास प्रकरणपरत्वे योग्य तो बदल करण्यात येईल. तसेच धोरणात्मक बाबींच्या प्रकरणात दि. ११/०८/२०१४ च्या परिपत्रकात नमूद केल्यानुसार सादरीकरणाचे तीनपेक्षा अधिक स्तर असतील.

३. सदर शासन कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०१२९१११११३०७६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra
Ramdas Petkar

Digitally signed by Ravindra Ramdas Petkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7faa8a0fe5f84a3356eee5e28943030f4417521c2e4121efd5e2b39c2eae27ce, serialNumber=93d05a1f2a6cead3ed9e358a4d06e909b2a25fe9a918a443e6204cd5d72b0ed9, cn=Ravindra Ramdas Petkar
Date: 2019.01.29 11:22:39 +05'30'

**(र. रा. पेटकर)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

२) प्रधान सचिव (ले. व को.) यांचे स्वीय सहायक, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

३) उप सचिव (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

४) उप सचिव (प्रशासन), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

५) अवर सचिव (आपुक), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,

६) निवडनस्ती /आपुक.

## कार्यालयीन आदेश क्र. संकीर्ण २०१९/प्र.क्र.१०/ आपुक, दि. २८ जानेवारी, २०१९ सोबतचे विवरणपत्र

| अ.क्र. | कार्यासनाकडून हाताळले जाणारे कामकाज | सादरीकरणाचे तीन स्तर | | | अंतिम निर्णय घेण्यास सक्षम प्राधिकारी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरुज्जीवन याबाबींचे निर्बंध व अनुषंगिक आढावे | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) | उच्चस्तरीय सचिव समिती |
| २ | अतिरिक्त संवर्ग योजनेंतर्गत कक्षाची स्थापना व त्याचे व्यवस्थापन | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) |
| ३ | खर्चात काटकसर करण्याच्या सर्वसाधारण / विशेष उपाययोजना | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) | मा.मंत्री (वित्त) |
| ४ | वित्तीय सुधारणा विषयक अन्य बाबींवर कार्यवाही करणे | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) | मा.मंत्री (वित्त) |
| ५ | मंत्रालयीन विविध विभागांकडून प्राप्त होणाऱ्या रिक्त पदांच्या धोरणात्मक बाबींच्या प्रस्तावांवर कार्यवाही करणे | कक्ष अधिकारी / अवर सचिव | उप सचिव | प्रधान सचिव (ले.व को.)/ अमुस (वित्त) | प्रधान सचिव, (ले.व को) / अमुस (वित्त) / मा. मंत्री (वित्त) |